**असुधारित वेतनश्रेणीत वेतन घेणाऱ्या राज्य शासकीय व इतर पात्र कर्मचाऱ्यांना मंजूर करण्यात येणाऱ्या महागाई भत्त्याच्या दरात दि. १ जानेवारी, २०१४ पासून सुधारणा करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मभवा-१११४/प्र.क्र.१९/सेवा-९**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीखः २५ जुलै, २०१४

**वाचा - शासन निर्णय क्रमांकः मभवा-१११३/प्र.क्र.२२/सेवा-९ दिनांक १८ नोव्हेंबर,२०१३**

**शासन निर्णय -**

महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम- २००९ अन्वये राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना दिनांक १ जानेवारी, २००६ पासून सुधारित वेतनसंरचना लागु करण्यात आली आहे. तथापि जे राज्य शासकीय कर्मचारी व महागाई भत्ता अनुज्ञेय असणारे इतर सर्व पात्र पूर्णकालिक कर्मचारी अद्यापही असुधारित वेतनश्रेणीत (पाचव्या वेतन आयोगानुसार) वेतन घेत आहेत, त्यांच्या महागाई भत्त्याच्या दरात सुधारणा करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

२. शासन असे आदेश देत आहे की, जे राज्य शासकीय कर्मचारी व महागाई भत्ता अनुज्ञेय असणारे इतर सर्व पात्र पूर्णकालिक कर्मचारी अद्यापही असुधारित वेतनश्रेणीत वेतन घेत आहेत, त्यांच्या असुधारित वेतनश्रेणीतील मूळ वेतन अधिक महागाई वेतन यावरील अनुज्ञेय महागाई भत्त्याचा दर १ जानेवारी, २०१४ पासून १८३% वरून २००% करण्यात यावा. दि. १ मे, २०१४ पासून सदर महागाई भत्त्याच्या वाढीची रक्कम रोखीने देण्यात यावी. दि.१ जानेवारी २०१४ ते दि. ३० एप्रिल, २०१४ या कालावधीतील महागाई भत्त्याच्या थकबाकीच्या आहरणाबाबत स्वतंत्रपणे आदेश निर्गमित करण्यात येतील.

३. महागाई भत्त्याची रक्कम प्रदान करण्यासंदर्भातील विद्यमान तरतुदी व कार्यपद्धती आहे त्याचप्रकारे यापुढे लागू राहील.

४. यावर होणारा खर्च संबंधित शासकीय कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते ज्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येतात, त्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून त्याखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. अनुदानप्राप्त संस्था व जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांच्या बाबतीत, संबंधित प्रमुख लेखाशीर्षाखालील ज्या उप लेखाशीर्षाखाली त्यांच्या सहाय्यक अनुदानाबाबतचा खर्च खर्ची टाकण्यात येतो, त्या उप लेखाशीर्षाखाली हा खर्च खर्ची टाकण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७२५१५१२२६२१०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Varsha Sunil Dongre

Digitally signed by Varsha Sunil Dongre
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Varsha Sunil Dongre
Date: 2014.07.25 15:12:30 +05'30'

**(वर्षा डोंगरे)**
उपसचिव वित्त विभाग

**प्रत,**

१. राज्यपालांचे सचिव
२. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव

३. उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
४. सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन , मुंबई
५. सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
६. मंत्रालयीन सर्व विभाग
७. मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व प्रादेशिक विभाग प्रमुख
८. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
९. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई
१०. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
११. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१२. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१३. आयुक्त, राज्य माहिती आयोग, (सर्व)
१४. सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई
१५. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई/नागपूर/औरंगाबाद
१६. राज्य महिला आयोग, वरळी ,मुंबई
१७. सर्व विभागीय आयुक्त
१८. सर्व जिल्हाधिकारी
१९. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा
२०. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड. पुणे
२१. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
२२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
२३. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
२४. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
२५. सिनियर रिसर्च ऑफीसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्र.२६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली
२६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
२७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२९. जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब,
३०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
३१. सर्व लेखाधिकारी, वेतन पडताळणी पथक,मुंबई/नागपूर/पुणे/औरंगाबाद.
३२. मुख्य अधिकारी, सर्व नगरपालिका
३३. कार्यकारी अधिकारी, कॅन्टोनमेंट बोर्ड, खडकी/देहूरोड/देवळाली/अहमदनगर
३४. कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी, जिल्हा अहमदनगर
३५. कुलसचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी
३६. कुलसचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली,जिल्हा रत्नागिरी.
३७. कुलसचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला

३८. कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई
३९. कुलसचिव, पुणे विद्यापीठ, पुणे
४०. कुलसचिव, नागपूर विद्यापीठ, नागपूर
४१. कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद
४२. कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड
४३. कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर
४४. कुलसचिव, अमरावती विद्यापीठ, अमरावती
४५. कुलसचिव, श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई
४६. कुलसचिव, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव
४७. कुलसचिव, सोलापूर विद्यापीठ, सोलापूर
४८. कुलसचिव, महाराष्ट्र पशू व मत्स्यविज्ञान विद्यापीठ, नागपूर
४९. कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे, रायगड
५०. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई
५१. उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर/ औरंगाबाद/नाशिक/ अमरावती.
५२. बहूजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई-१
५३. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ., बॅरॅक क्रमांक १, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई-२०
५४. भारतीय कम्युनिस्ट पार्टी,महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन,एस.व्ही.पटेल रोड, मुंबई-४
५५. भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-१३
५६. इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस(आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-२५
५७. नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन,फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट,मुंबई-२१
५८. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-२८
५९. वित्त विभागातील सर्व कार्यासने
६०. निवड नस्ती, वित्त विभाग (सेवा-९)